

# रेचल कार्सनचे पुस्तक ज्याने जग बदलले.

लौरा बीइंगेसनर, चित्र : लॉरी लॉलर

अग्रणी पर्यावरणवादी रेचल कार्सनने  लिहलं, “एकदा तुमचा परिचय  पृथ्वीवरच्या आश्चर्य आणि सुंदरतेशी  झाला की तुम्हांला तिच्याबद्दल अजून जाणून घेण्याची इच्छा होईल.” रेचलने निसर्गाच्या अभ्यासाचे  अनेक साहसी प्रकार शोधले. तिने  कोरल रीफ्स ची तपासणी करण्यासाठी समुद्रात बुड्या मारल्या आणि फ्लोरिडा एवरग्लेड्समध्ये  "ग्लेड्स  टांगा " वर बसून मगरीचा पाठलाग केला. अर्थात तिच्या  सगळ्यात साहसी कामामधलं एक काम होतं, "साइलेंट स्प्रिंग“ नावाचे एक पुस्तक लिहणे आणि प्रकाशित करणे . त्या पुस्तकाने जगाला रासायनिक खते आणि कीटनाशकांच्या भयंकर परिणामांची जाणीव  करून दिली.  शक्तिशाली  लोकांनी त्या पुस्तकाच  प्रकाशन  रोखण्याचा भरपूर  प्रयत्न केला,  पण  रेचल आणि तिचे  प्रकाशक  घट्ट उभे राहिले आणि  शेवटी  "साइलेंट स्प्रिंग"  पुस्तक एक बेस्ट-सेलर  झाले. ज्याने लोकांना  पृथ्वीवर कीटनाशकांमुळे होणाऱ्या हानिकारक  परिणामांपासून सावध केले.

# रेचल कार्सनचे पुस्तक
# ज्याने जग बदलले.

लौरा बीइंगेसनर, चित्र : लॉरी लॉलर

मराठी : अश्विनी बर्वे





मे १९२२च्या एका सकाळी, तरुण रेचल कार्सनने देवदार झाडाच्या गर्द जंगलात,एक गुप्त गोष्टीचा शोध घेतला. वटवट्या,वटवट्या! पिवळ्या गळ्याचा पक्षी ओरडत होता. रेचलने एलेघेनी नदीच्या किनाऱ्यावरील पहाडाच्या वर आणि खाली त्या जंगली पक्ष्याचा पाठलाग केला. शेवटी रेचल एका झाड़ीत लपलेल्या त्या पक्ष्याच्या घरट्यापर्यंत पोहचली. त्या घरट्याच्या जवळ गेली, मग तिने आपला कॅमेरा क्लिक केला.

रेचलच्या कॅमेराने पांढऱ्या-करड्या रंगाची चार अंडी  कॅमेरात कैद केले,  जी एका फुलासारखी चमकत होती.

रेचल कार्सनचे सारे आयुष्य जिज्ञासेने भरलेले आणि दृढ़निश्चयी होते.

तिचा जन्म २७ मे, १९०७ ला स्प्रिंगडेलच्या बाहेरच्या इलाख्यात झाला होता.

स्प्रिंगडेल, पेंसिल्वेनिया राज्यातले एक छोटे शहर होते.

तिचे भाऊ-बहीण तिच्यापेक्षा खूप मोठे होते म्हणून शेजारची मुलं कधीतरी तिच्या घरी येत असत.

म्हणून रेचल नेहमी आपल्या परिवाराच्या पासष्ट एकर जमिनीचे, जंगलाचे ,बागेचे आणि शेताचे निरीक्षण करायला एकटीच फिरत असे.





रेचलच्या प्रेमळ आईला निसर्गाचे प्रेम होते.

आई, चांदण्या रात्री रेचलला आकाश दाखवत असे, ताऱ्यांची नावं सांगत असे आणि  सुतार पक्ष्याचा आवाज ओळखायला शिकवत असे.

रेचल सतत अभ्यास करत असे आणि शाळेत तर ती खूप मेहनत घेत असे.

जेव्हा ती केवळ ११ वर्षाची होती, तेव्हा तिने एका  शूर पायलट च्या वर कहाणी लिहिली. ज्याला एक पुरस्कार मिळाला. ती कहाणी मुलांच्या मासिकात "सेंट निकोलस" मध्ये प्रकाशित झाली.

त्यानंतर रेचलने एक लेखक होण्याचे ठरवले.



तो काळ खूप कठीण होता.  रेचलचे वडील  एक सेल्समेन  होते. त्यांना उपजीविकेसाठी खूप संघर्ष करावा लागत असे.  रेचलची स्वाभिमानी आई पियानो शिकवत असे. त्यांनी कमाई वाढविण्यासाठी आपल्या विद्यार्थांची संख्या  दुप्पट केली. त्यांनी  सफरचंद ,कोंबड्या  एवढंच नाही तर परिवाराचे आवडते कप, ताटल्या पण विकल्या. ज्यामुळे रेचलला पिट्सबर्गच्या पेंसिल्वेनिया कॉलेज फॉर विमेन ( ज्याला नंतर चैथम कॉलेज नाव दिले गेले. ) मध्ये पाठवण्यासाठी मदत होईल.

जेव्हा रेचलला  शैक्षणिक छात्रवृत्ती  मिळाली तेव्हा ती एक उधारीच्या मॉडल-टी मोटरकार मध्ये चढली आणि  तिने आपल्या परिवाराचा निरोप घेतला.

लाजाळू  रेचलसाठी कॉलेज म्हणजे एक नवीन जग होते.  तिला लेखनाच्या वर्गात खूप मजा येई पण तिला पार्ट्या आणि नृत्यामध्ये विचित्र वाटे. जेव्हा प्रत्येकजण  कार्नेगी म्यूजिक हॉलमधील संगीत कार्यक्रमात जाण्याची तयारी करत असे, तेव्हा  रेचल  जवळच्या प्राकृतिक इतिहास संग्रहालयात भुस्सा भरलेल्या पक्ष्यांचा अभ्यास करायला जाई.

पण  त्यामुळे तिच्या सामाजिक जीवनात कोणतीच  सुधारणा झाली नाही कारण रेचलची कठोर आई जवळजवळ दर आठवड्याच्या शेवटी  रेचेलचे कागद टाइप करण्यासाठी पोहचत असे.



उन्हाळ्यात जेव्हा रेचल कॉलेजमधून पहिल्या वर्षी घरी परत आली, तर तिला प्रत्येक जागी दुर्गंधी आली. आकाशात धूर पसरला होता. नदीत प्रदूषण तरंगत होते.

कारखान्यांसाठी आणि घरांसाठी अमाप जंगल तोड झाली होती. आता खूप साऱ्या भांडकुदळ लोकांनी तिच्या छोट्या घरात आपला मुक्काम टाकला होता.

तिचे आई-वडील, गरिबीमुळे तिचा भाऊ त्रासला होता आणि त्याची पत्नी आणि मुलगा, तिची घटस्फोटीत बहीण आणि तिचे दोन खोडकर मुलं.त्यांनी रहाण्यासाठी समोर अंगणात तंबू लावला, पण त्याशिवाय सगळ्यांसाठी खूप कमी जागा होती.

मग रेचल कुठे जाऊ शकणार होती? त्या सगळ्यांनी तिला पर्यावरण आणि आपल्या भविष्याच्या बाबतची उदासी आणि चिंतेने भरून टाकलं.



पण जेव्हा ती  कॉलेजमध्ये परत गेली, तेव्हा  जीव-विज्ञानच्या शिक्षिका मिस मेरी स्कॉट स्किंकरच्या जीवांत शिक्षणाच्या  प्रकाराने रेचलचे जीवनही बदलून गेले.

तो असा काळ होता जेव्हा खूप कमी स्त्रिया विज्ञानात करीयर करू शकत असत. पण रेचलने जैव वैज्ञानिक होण्याचे ठरवले.

तिला प्राणी आणि वनस्पतीबाबत खूप शिकण्याची इच्छा होती.

तिला माहित होते की ग्रॅजुएट स्कूलची फी देण्यासाठी ती कोणता तरी मार्ग शोधेल.

मग तिने जॉन्स हॉपकिन्स विश्वविद्यालयात शिकण्यासाठी पूर्ण शिष्यावृत्ती जिंकली.

ग्रॅजुएट स्कूल सुरु करण्यापूर्वी उन्हाळ्यात बावीस वर्षाची रेचल, वुड्स-होल, मॅसाचुसेट्सच्या समुद्री जीव-विज्ञान प्रयोगशाळेत अध्ययन करण्यासाठी गेली.

जेव्हा ती पहिल्यांदा अटलांटिक महासागरच्या किनाऱ्यावर उभी राहिली, तेव्हा ती पाणी आणि आकाशाच्या विचित्र दुनियेत पूर्ण हरवून गेली. समुद्राचा फेस किनाऱ्यावर आपटत होत्या. समुद्री पक्षी ओरडत होते. हवेत एक खारट वास होता. आणि भरती-ओहोटीच्या लाटेत काही रहस्यमयी जीव होते. समुद्राच्या लाटांखाली अजून काही जीव लपले असतील?






रेचलने आपली पदव्युत्तर पदवी मिळवली. तिच्या वर्गात काही मुठभर  स्त्रिया होत्या.

त्याकाळात मोठ्या प्रमाणावर बेरोजगारी पसरली होती. महामंदीमुळे तिने आपले पुढचे शिक्षण चालू राहील याची आशा सोडली होती.

कोणीही एक महिला जैव वैज्ञानिकाला कामावर ठेवू इच्छित नव्हतं.

जेव्हा तिच्या वडिलांचा  मृत्यू झाला तेव्हा अठ्ठावीस वर्षाची रेचल आपल्या परिवाराला आर्थिक मदत व्हावी म्हणून  पैसे मिळवण्यासाठी उत्सुक होती.

उतिची आई, आजारी बहीण आणि दोन तरुण भाच्या, रेचलच्या मैरीलैंड घरात तिच्याजवळच राहत असत.

अवर्तमानपत्रात लेख लिहण्याचे आणि काही अंशकालीन नोकरीमुळे  घरभाडे आणि खाण्यापिण्याची बिलं ती मोठ्या मुश्किलीने भरत होती.
मग एक दिवस रेचल आपल्या जुन्या  शिक्षिकेकडे  सल्ला घेण्यासाठी गेली.



मैरी स्कॉट स्किंकर

सरकारी वैज्ञानिक होण्याच्या परिक्षेला बैस. मिस स्किंकरने सुचवलं.

रेचल  परीक्षेत प्रथम स्थानावर आली पण तरीही तिला नोकरी मिळाली नाही.

पण तिने हार मानली नाही. ती दरवाज्यावर थापा मारत राहिली आणि अर्ज पाठवत राहिली.

एक दिवस माशांच्या ब्यूरोचे प्रमुखाने रेचलची मुलाखत घेतली.  क्षमा करा, कोणतीही नोकरी नाही, ते म्हणाले. असं होऊ शकतं का रेचल  समुद्री जीवनाच्याबाबत कंटाळवाणे रेडियो स्क्रिप्ट ठीक करण्यासाठी थोडीसी तुम्ही लिहलेला एकही शब्द  कधी बघितला नाही,"  रेचलने नंतर प्रमुखाचे शब्द आठवत म्हणाली, "पण तरीही  मी तुला एक संधी देईन."

तो  रेचलसाठी एक भाग्यशाली ब्रेक होता. तिचे स्क्रिप्ट खूप सफल झाले.

त्यानंतर रेचलला मत्स्य पालन ब्यूरोमध्ये एक जीव-वैज्ञानिकाच्या रुपात पूर्णकालीन नोकरी मिळाली.

स्टाफमध्ये केवल दोन व्यावसायिक महिला होत्या. रेचल त्यांच्यातली एक होती.

तिला रेडियो प्रसारणा साठी समुद्राबाबत लिहण्याचे काम सोपवले.

पण तिने  "स्थिती सांभाळून घेतली".

प्रमुखाने रेचलचा लांबलचक आलेख वाचला आणि मग तिला परत केला.

त्यांनी डोळ्यात चमक दाखवत म्हटले, "मला नाही वाटत हे चालेल. तुम्ही परत चांगला प्रयत्न करा. पण हे 'अटलांटिक' ला पाठवा".



रेचलने सल्ला मानला.

जेव्हा मासिकाने "अंडरसी" (समुद्रच्या खाली) लेख छापला. त्यानंतर एका प्रकाशकाच्या संपादकाने रेचलशी संपर्क केला.

सामान्य वाचकांसाठी तुम्ही समुद्राच्याबाबत पुस्तक का लिहित नाहीत?"

१९४१ मध्ये रेचलने आपले पहिले पुस्तक, "अंडर द सी-विंड: ए नेचुरलिस्ट्स पिक्चर ऑफ ओशन लाइफ" प्रकाशित केले. त्याचवेळी पर्ल हार्बरवर बॉम्ब पडला आणि अमेरिकेने द्वितीय विश्व युद्धात भाग घ्यायला सुरुवात केली.

त्या पुस्तकावर कोणाचे लक्ष गेले नाही आणि लवकरच ते पुस्तक पुस्तकांच्या दुकानातून गायब झालं.



पण रेचलने जीवनातले उल्लेखनीय ताणेबाण्याच्या संदर्भात शोध घेणं आणि लिहणं बंद केले नाही. “एकदा तुमचा पृथ्वीवरील आश्चर्य आणि सुंदरतेशी परिचय झाला,” तिने एका मासिकात लिहलं, “मग तुम्हांला त्याबाबत अधिक जाणून घ्यावं वाटतं.”

पंधरा वर्षातच एक जैव वैज्ञानिक म्हणून रेचल ज्या स्थानावर पोहचली तिथं खूप महिला कधी पोहचल्या असतील.

तिने महिलांसाठी काम पण केले : नोवा स्कोटियाच्या दक्षिणेला धुक्यात, भयंकर प्रवाहात, खोल समुद्रात माशांची मोजणी केली. फ्लोरिडातटावर एका चौरांशी पौंडचे हेल्मेट आणि विशेष पोषाख घालून पाण्याखालील प्राण्यांचे अवलोकन केलं. फ्लोरिडा एवरग्लेड्सच्या दलदलीत "ग्लेड्स बग्गी" वर स्वार होऊन मगरीचा शोध घेतला..



हे करत असतांनाच मधल्या काळात आठवड्याच्या शेवटी संध्याकाळी ती आपल्या लेखनावर काम करत असे.

ती त्रास देणाऱ्या प्रवृतींची नोंद घेवू लागली. जीवनाच्या सुंदर विणलेल्या जाळ्याचे काय होणार जेव्हा मनुष्य अधिकाधिक कचरा समुद्रात फेकेल? समुद्राचे वाढते तापमान  तिथल्या जिवंत प्राण्यांवर काय परिणाम करेल?

१९५१ मध्ये तिने एक बेस्ट सेलर पुस्तक, "द सी अराउंड अस" (आमच्या जवळचा समुद्र ) प्रकाशित केलं एक वर्षानंतर पूर्णवेळ लेखन करण्यासाठी तिने आपली नोकरी सोडून दिली.

पुढची तीन वर्षे तिने "द एज ऑफ़ द सी" वर संशोधन केले आणि त्यावर लिहले.

आता ती एवढी  प्रसिद्ध झाली होती की लोक लिफ्ट, ब्यूटी पार्लर, टॅक्सी आणि रेस्टॉरंट मध्ये त्यांच्याजवळ येऊन ऑटोग्राफ मागू लागले.



रेचलने कधी लग्न केले नाही.

घरात केवळ ती एकटी कमावणारी होती, तरी ती परिवारातल्या अनेक बेरोजगार, आजाराने मरणाऱ्या सदस्यांची सुद्धा देखभाल करत असे.

पन्नास वर्षाच्या रेचलने आपल्या भाच्चीच्या पाच वर्षाच्या मुलाला रॉजरला दत्तक घेतलं.

मग तिला त्या खोडकर मुलांची देखभाल करतांना लिहण्यासाठी वेळ कसा काढावा या गोष्टीचा सामना करावा लागला..



नेहमी, रेचलला घराच्या बाहेर निसर्गाच्या कुशीतच आराम आणि सुख मिळत असे.

तिने मेन नदीच्या किनाऱ्याजवळ काही एकर जमीन खरेदी केली आणि  तिथं तिने उन्हाळ्यासाठी एक घर बांधले.

“ती जागा म्हणजे एक  खजाना आहे," रेचल म्हणत असे.

दिवसा ती दाट झाडीमध्ये, झाडांच्या दाट सावलीतून  शेवाळ्याचे आणि फर्न वृक्षाचे निरीक्षण करण्यासाठी रॉजर बरोबर फिरत असे.

रात्री  भरती ओहोटी कमी असतांना, ती एक  विजेरी घेऊन एकटीच खडकांच्या किनाऱ्यावर जात असे.

ती आपली पँट खालून मुडपत असे आणि  उथळ पाण्यात पोटावर पडत असे आणि तिथं ती खेकडे , स्टार-फिश आणि एनीमोन शोधत असे.



१९५८ मध्ये रेचलने एक कठीण नवीन योजना सुरु केले.

जेव्हा दुसरे विश्वयुद्ध समाप्त झाले त्यानंतर अमेरिकेत रासायनिक उद्योग खूप शक्तिशाली झाला होता.

कीड मारण्यासाठी रसायने मोठ्या प्रमाणावर बागेत आणि नैसर्गिक जंगलात फवारले जाऊ लागले. एवढंच नाही स्विमिंग पूल आणि गर्दी असणाऱ्या शहरातल्या रस्त्यांवर सुद्धा मोठ्या प्रमाणावर फवारले जाऊ लागले.

१९४५ च्या सुरुवातीला, रेचलने देशभरात पक्ष्यांच्या घटणाऱ्या संख्येबद्दल वाचलं.

प्रत्येकवर्षी संशोधकांनी कमी असणारी घरटी आणि कमी होणाऱ्या प्रवासी पक्ष्यांची संख्या याबाबत सूचना दिली.

रेचलने जेवढा तपास केला, ते आकडे बघून ती अधिक चिंतेत पडली.

कीटनाशक पक्षी, किडे, मासे आणि इतर जनावरांसाठी घातक होते.

आणि लोकांवरचा त्याचा परिणाम?

कोणीही या मोठ्या व्यावसायांना, रसायनांना मंजुरी देणाऱ्या एजन्सी, रसायनांचा परिणामांचा अभ्यास करून शोध करणारे विश्वविद्यालयांच्या विरोधात आपला आवाज उठवला नाही.

रेचलला माहित होतं की ती धोकादायक क्षेत्रात पाऊल ठेवत आहे.

पण तिचा उद्योग, सरकार या एखाद्या विश्वविद्यालयाशी कोणताही संबंध नव्हता.
म्हणून तिला वाटले की ती अधिक स्वतंत्रपणे पुरावे गोळा करू शकत होती.

तिला वाटले की ती जे लिहीन ते लोक वाचतील आणि मग ते
साफ़ हवा, स्वच्छ पाण्याच्या मागणीसाठी संघर्ष करतील.



केवळ  रेचलचे सगळ्यात जवळच्या मित्रांनाच माहित होते की , रेचल  त्यावेळी  खूप आजारी होती.  १९६० मध्ये तिला स्तन कँन्सर झाला होता. तिचे पुस्तक "साइलेंट स्प्रिंग" मध्ये अशा काही गोष्टी होत्या, ज्यावर तिचा अतूट विश्वास  होता. “अडचणी आल्यातरी मी मागे  फिरण्याचा विचार केला नाही.”  तिने  "साइलेंट स्प्रिंग“ पूर्ण करण्यासाठी चार वर्षे अथक परिश्रम केले.

कीटनाशकांच्या बाबत तिचा शोध सावधानतेने पुढे जात होता.

त्याचे लेखन आणि पुनर्लेखन अधिक संथपणे चालू होते.

ती असे एक पुस्तक लिहू इच्छित होती, जे प्रत्येक सामान्य व्यक्ती समजू शकेल- केवळ वैज्ञानिक  नाही.

आजारी आणि थकव्याने बेजार होऊन सुद्धा  तिने हार मानायला नकार दिला.  “ मी परत कधी सुतार पक्ष्याचे गाणे आनंदाने ऐकू शकली नसती.” रेचल  म्हणाली, “जर मी ते  सगळं केलं नसतं, जे मी करू शकत होते.”



१९६२ मध्ये "साइलेंट स्प्रिंग" प्रकाशित झाले आणि एक बेस्ट सेलर पुस्तक झाले.

या पुस्तकाच्या प्रकाशनामुळे रासायनिक उद्योगांच्या अंगाचा तिळपापड झाला.

कांग्रेसने दाद मागितली.

त्यानंतर तपास झाला.

नवीन कायदे लिहले गेले, रेचलच्या पुस्तकाने प्रेरित होऊन खूप सारे सामान्य लोकांनी अनेक विधायक कामं केली. पण रेचल ते पर्यावरणीय परिवर्तन बघायला जिवंत राहिली नाही.

१४ एप्रिल १९४६ ला, पक्ष्यांच्या गाण्याने भरलेला वसंताचा सूर्यास्त बघण्याआधीच छप्पन वर्षाच्या रेचलचा मृत्यू झाला.



# "साइलेंट स्प्रिंग" चे प्रकाशनानंतर काय झाले?

"साइलेंट स्प्रिंग" चे  शक्तिशाली शीर्षक वसंतामधल्या पक्षांची किलबिल शांत झाल्याचे प्रतिक होते.

द न्यू यॉर्करने १६  जून,१९६२ पासून  "साइलेंट स्प्रिंग" चा पहिला भाग छापला आणि ह्यूटन मिफ्लिनने  सप्टेंबर २७ ला  हे पुस्तक प्रकाशित  केले.  त्यानंतर लगेचच  एका प्रमुख रासायनिक कंपनीने प्रकाशन थांबवण्यासाठी द न्यू यॉर्कर आणि ह्यूटन मिफ्लिन वर कायदेशीर दावा करण्याची धमकी दिली. पण न वर्तमानपत्राने आणि न पुस्तक प्रकाशकाने आपले गुडघे टेकवले.  त्यानंतर रासायनिक उद्योगाने पुस्तकावर एक ज़ोरदार हल्ला केला.

पण तरीही "साइलेंट स्प्रिंग"  लगेचच एक सर्वाधिक विकले जाणारे पुस्तक झाले..

रासायनिक उद्योग आणि काही सरकारी  एजन्सींनी "साइलेंट स्प्रिंग" आणि  रेचल कार्सन च्या विरुद्ध एक कपटी , पैशाने चालणारे आणि दूषित अभियान चालवले. ज्यात रेचलला  "एक उन्मादी महिला"  म्हटलं. जी “कदाचित  एक कम्युनिस्ट" होती. एक पूर्व कृषी सचिवाने राष्ट्रपती ड्वाइट डी. आइजनहावर यांना पत्र लिहले आणि विचारले की "एक  मूल न झालेली कुमारी महिलेला जेनेटिक्सबद्दल एवढी चिंता का होती.” एका समीक्षकाने तिच्या पुस्तकाला  "इमोशनल एंड अलार्मिस्ट" असं म्हटलं आणि  कार्सनला  "ऑर्गेनिक-गार्डिंग फ़ैडिस्ट्स" आणि  "अतिवादी" आणि चुकीच्या गोष्टी पसरवणाऱ्या समुहाचा हिस्सा म्हटलं.

शेवटी, कार्सनचा विजय झाला.

सार्वजनिक आवाजाने कांग्रेस, कृषी आणि आंतरिक विभाग, सार्वजनिक स्वास्थ्य सेवा आणि खाद्य एवं औषधि प्रशासन कडे आपल्या पत्रांनी दाबून टाकलं. वर्तमान पत्र आणि मासिके जहाल संपादकीय आणि पत्र छापत राहिले. ऑगस्ट १९६२ मध्ये , राष्ट्रपती जॉन एफ. कैनेडी यांनी कीटनाशकच्या तपासणी साठी राष्ट्रपतीची विज्ञान सल्लागार समितीचे  एक विशेष पैनल नियुक्त केले. त्यांनी प्रकाशित केलेल्या रिपोर्टची रासायनिक उद्योग आणि सरकारी एजन्सीने आलोचना  केली.. कार्सनने  एप्रिल १९६३ मध्ये  सीबीएस वर  आपली  विशेष मुलाखत देऊन टिव्हीवर दर्शकोंना आवाहन केले. पर्यावरणीय धोक्यांची कार्सनने दिलेली सूचना एक सीनेट समितीने दोन महिन्यानंतर प्रसारित केलं .

मधल्याकाळात "साइलेंट स्प्रिंग" ग्रेट ब्रिटेनमध्ये सर्वाधिक विकले जाणारे पुस्तक झाले. ते पुस्तक फ्रान्स, जर्मनी, इटली, डेनमार्क, स्वीडन, नॉर्वे, हॉलैंड, स्पेन, ब्राझील, जपान मध्ये पण प्रकाशित झाले. आइसलैंड, पोर्तुगाल आणि इस्त्राईल मध्ये पुस्तकाला सम्मान आणि पुरस्कार मिळाले. मार्च १९६३ मध्ये, रेचल कार्सनला राष्ट्रीय वन्यजीव महासंघ द्वारे वर्षातले संरक्षणवादी घोषित करण्यात आले. तिला अमेरिकेचे इसाक वाल्टन लीगचा संरक्षण पुरस्कार, नेशनल ऑडबोन सोसायटीचा ऑडबोन मेडल, आणि अमेरिकन जिओग्राफिकल सोसायटीकडून कुल्लम मेडल पण मिळाले. कार्सन, अमेरिकन अकॅडमी ऑफ आर्ट्स एंड लेटर्स साठी तिची निवड झाली- जिथल्या फक्त चार महिलांमध्ये ती एक होती.

गंभीर पर्यावरणीय धोक्यांपासून सुटका व्हावी म्हणून अजून खूप काही करणं बाकी आहे. त्याचबरोबर हे लक्षात ठेवणं महत्वपूर्ण आहे, की एखाद्या वक्तृत्वामध्ये व्यक्त केलेले सत्य जगाला बदलण्याची शक्ती आहे. "साइलेंट स्प्रिंग” च्या प्रकाशना नंतरच्या वर्षाने, जमीनी-स्तरावरील पर्यावरण समूह आणि अन्य स्थानीय नागरिकांना पर्यावरणाची रक्षा करण्यासाठी संघीय कायदे पारित करण्यासाठी प्रेरित केले.

कोर्टातल्या लांबलेल्या संघर्षा नंतर १९७२ मध्ये डीडीटीचा व्यापक उपयोगावर प्रतिबंध लावला गेला. कार्सनचे आधारभूत कार्य आणि निरंतर शोधाने शाबित केलं की, डीडीटीचा पक्षी प्रजननावर विनाशकारी प्रभाव पड़त होता.

"साइलेंट स्प्रिंग" ने केवळ अनेक पक्षी प्रजातियोंनाच वाचवलं नाही तर त्याने लाखों लोकांचे डोळे उघडले आणि त्यांना एका नवीन विचाराशी परिचय करून दिला. आम्ही हवा, पाणी आणि माती बरोबर जे काही करतो, त्याचा परिणाम सरळ आपल्यावर, येणाऱ्या पिढीवर आणि धरतीवर राहणाऱ्या जनावरांवर आणि पिकांवर होतो. रेचल कार्सनने हे दाखवून दिले की, एक प्रतिबद्ध व्यक्ती कसा बदल करू शकते. जसे की पूर्व उपराष्ट्रपती अल गोर हे आज गोल्बल वार्मिंगच्या मुद्दावर काम करत आहेत. ते म्हणाले की, साईलंट स्प्रिंग हे पुस्तक एक व्यथेच्या रुपात लिहले आहे. त्यात सखोलता आहे,चांगला शोध आहे. व ते छान ढंगात लिहले आहे. या पुस्तकातल्या तर्कामुळे इतिहासाचा पाठ्यक्रम बदलला. या पुस्तकाशिवाय पर्यावरण आंदोलन लांबवर पडले असते किंवा ते कधीच विकसित झाले नसते.